मालेगाव शहरातील सर्वे नं.१६९ मधील उर्दू शाळा क्र.६४ च्या जवळील २०,००० चौ.फू. क्षेत्र फळाचा भूखंडावर उर्दू घर बांधण्यासाठी वर्ष २०१८-१९ मध्ये अनुदान वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः माऊघ २०१८/प्र.क्र.६५/का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २४.०१.२०१९

**वाचा -**

१) जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक यांचे पत्र क्र.जिनिस/ क १२/ संस२/ उर्दूघर/१८-१९/८०६१, दि.२९.१२.२०१८

२) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक माऊघ २०१८/प्र.क्र.६५/का.४, दि.२३.०८.२०१८.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांकः अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२.०४.२०१८

**प्रस्तावना -**

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मालेगाव शहरातील सर्वे नं.१६९ मधील उर्दू शाळा क्र.६४ च्या जवळील २०,००० चौ.फु.क्षेत्रफळाचा भुखंडावर उर्दू घर बांधण्याच्या रु.७,८४,१५,९६६/- (रुपये सात कोटी चौऱ्याऐंशी लाख पंधरा हजार नऊशे सहासष्ट मात्र) इतक्या प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यास अनुसरुन, मालेगाव शहरातील उर्दू घर बांधकामासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय -**

वरील संदर्भ क्र.३ येथील शासन परिपत्रकातील तरतुदीस अनसरुन, उर्दू घरासाठी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर असलेल्या .रु.८.०० कोटी (रुपये आठ कोटी मात्र ) इतक्या योजनांत्तर्गत अर्थसंकल्पीय अनुदानाच्या ७०% इतक्या मर्यादेत राहून जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक यांनी संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार मालेगाव उर्दू घरासाठी रु.३,८४,१५,९६६/- (रुपये तीन कोटी चौऱ्याऐंशी लाख पंधरा हजार नऊशे सहासष्ट मात्र) इतके अनुदान जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक यांना वितरित करण्यास याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

जिल्हा नियोजन अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक यांना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली रु.३,८४,१५,९६६/- (रुपये तीन कोटी चौऱ्याऐंशी लाख पंधरा हजार नऊशे सहासष्ट मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण करुन कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मालेगाव यांना संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे. सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र जिल्हाधिकारी, नाशिक यांनी शासनास सादर करावे.

यावर होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००- इतर कार्यक्रम- राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

हा शासन निर्णय, शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक, अर्थसं २०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दि.०२ एप्रिल, २०१८ आणि अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२४१६२९२३०११४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Sadashiv Choukekar

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=965737dc18a2c1fbaf047c7a9f61259e5c65db981c8eaaab6c983897e5318874, serialNumber=d8e4f67b3825f197df63f949fa4b661ca6c21333d9afdb92501b830b9d0ca5c6, cn=Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2019.01.24 17:14:40 +05'30'

**( म.स.चौकेकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता),महाराष्ट्र राज्य,मुंबई/ नागपूर,
२. आयुक्त, नाशिक महसूल विभाग, नाशिक,
३. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, नाशिक,
४. आयुक्त, मालेगाव महानगरपालिका, मालेगाव
५. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
६. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मालेगाव,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक,
८. अधीक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दु साहित्य अकादमी, मुंबई,
९. खाजगी सचिव, मा.मंत्री/मा.राज्यमंत्री (अ.वि.वि.) यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई,
१०. स्वीय सहायक, प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. स्वीय सहायक, सह सचिव,अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२. स्वीय सहायक, उप सचिव (अर्थ), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. कक्ष अधिकारी (का-७). अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१४. वित्त विभाग / नियोजन विभाग / सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती (का-४)/कार्यासन-४, संग्रहार्थ.